राष्ट्रीय जलीय पर्यावरण संवर्धन योजना (एन.पी.सी.ए) या केंद्र शासन पुरस्कृत योजनेंतर्गत धर्मवीर संभाजी (कंबर) तलाव, सोलापूर संवर्धनासाठी सोलापूर महानगरपालिकेने SNA खात्यात जमा केलेला मॅचिंग हिस्सा सोलापूर महानगरपालिका यांना खर्चासाठी उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रासयो-२०२१/प्र.क्र.०२/आस्थापना-अ**
नविन प्रशासन भवन, १५वा मजला,
हुतात्मा राजगूरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २१/०३/२०२३.

**संदर्भ-** १. भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालयाचे कार्यालायीन ज्ञापन F. No. १(१३) PFMS/FCD / २०२०, दि. २३ मार्च, २०२१
२. केंद्रीय पर्यावरण, वन व वातावरणीय बदल मंत्रालयाचे दि. ३१.१२.२०२१ रोजीचे पत्र.
३. संचालक, व्यय विभाग, वित्त मंत्रालय, भारत सरकार याचे दि.०७.०७.२०२२ रोजीचे पत्र.
४. शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक रासयो-२०२१/प्र.क्र.०२/ आस्थापना-अ, दिनांक २०.०७.२०२२.
५. शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमाक रासयो-२०२१/प्र.क्र.०२ / आस्थापना-अ, दिनांक ०६.१०.२०२२.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या " National Plan for Conservation of Aquatic Eco-systems (NPCA)"या योजने अंतर्गत तलावांचे संवर्धन करण्यात येते. सदर केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व जलवायु परिवर्तन विभागाच्या दिनांक १२.०९.२०१८ च्या प्रशासकीय मान्यतेअन्वये सोलापूर महानगरपालिकेच्या धर्मवीर संभाजी तलावाचे संवर्धन करण्यासाठी रु. १२.२१ कोटीच्या प्रकल्पास मान्यता मिळाली असून त्याअंतर्गत रुपये ७,३२,६७,८००/- (६०%) केंद्र शासनाचा व रुपये ४,८८,४५,२००/- (४०%) सोलापूर महानगरपालिकेचा सहभाग मान्य करण्यात आलेला आहे.

२. या प्रकल्पासाठी सन २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाने प्रथम हप्त्यापोटी वितरीत केलेले रुपये ३,६६,३३,९००/- इतका निधी पर्यावरण विभागाच्या दि.०७ मार्च, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सोलापूर महानगरपालिकेस उपलब्ध करून देण्यात आलेला होता. केंद्र शासनाने वितरीत केलेला द्वितीय हप्ता रु.३,००,००,०००/- (रु. तीन कोटी मात्र) इतका निधी सोलापूर महानगरपालिकेस पर्यावरण विभागाच्या दि.०६ ऑक्टोबर, २०२२ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. भारत सरकार

यांच्या वित्त मंत्रालयाचे दि.२३.०३.२०२१ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनात नमूद सुधारित कार्यपद्धतीनुसार सोलापूर महानगरपालिकेने दि.२२.१२.२०२२ रोजी त्यांच्या हिश्यापैकी रु.७२,४९,८५४/- तसेच दि.०४.०३.२०२३ रोजी रुपये १,०३,५०,१४६/- असे एकूण रुपये १,७६,००,०००/- इतका निधी SNA खात्यात जमा केला आहे. सदर निधी PFMS प्रणालीमार्फत सोलापूर महानगरपालिका यांना खर्चासाठी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) द्वारे निधी वितरित करण्यास सुरूवात करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने National Plan for Conservation of Aquatic Ecosysterns (NCPA) ही केंद्र पुरस्कृत योजना PFMS प्रणालीवर मॅप केलेली आहे. सदर योजनेंतर्गत धर्मवीर संभाजी तलावाच्या संवर्धनासाठी केंद्र शासनामार्फत वितरित करण्यात आलेला रु. ३,००,००,०००/- (रु. तीन कोटी फक्त) इतका निधी सोलापूर महानगरपालिका याना वितरित करण्यात करण्यात आलेला आहे. दि.२३.०३.२०२१ रोजीच्या सुधारित कार्यपद्धतीनुसार केंद्र शासनाने वितरित केलेला हिश्यानुसार सोलापूर महानगरपालिकेने समरूप हिस्सा (रुपये २ कोटी फक्त) SNA खात्यात जमा करणे आवश्यक आहे. त्यानुसार आतापर्यंत केंद्र शासनाने सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने रुपये ७,३२.६७,८००/- इतक्या हिश्यापैकी ९०.९४% म्हणजे एकूण रु.६,६६,३३,९००/- इतका निधी वितरित केलेला आहे. तसेच सोलापूर महानगरपालिकेने अद्यापपर्यंत रु. २,६३,७६,५८४/-, रु. ७२,४९,८५४/- व रु. १,०३,५०,१४६/- असा एकूण रु.४,३९,७६,५८४/-(९०.०३%) इतका निधी जमा केलेला आहे.

२. उपरोक्त वस्तूस्थिती लक्षात घेता राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेंतर्गत सुधारित कार्यपद्धतीनुसार धर्मवीर संभाजी तलावाच्या संवर्धनासाठी प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार सोलापूर महानगरपालिकेने SNA खात्यात जमा केलेला समरूप हिस्सा रुपये १,७६,००,०००/- (रु. एक कोटी शहात्तर लक्ष फक्त) इतका निधी PFMS प्रणालीमार्फत सोलापूर महानगरपालिका यांना या शासन निर्णयान्वये खर्चासाठी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

३. सदर योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारित कार्यपद्धतीनुसार या योजनेकरिता Single Nodal Agency म्हणून सहसचिव पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे.

४. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत केंद्र शासनाची दि.२३.०३.२०२१ रोजीची सुधारित कार्यपद्धती/मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांनी घ्यावी.

५. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२११२४२३८२८०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2023.03.21 12:49:44 +05'30'

**( सु. कि. निकम ),**
**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल),**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री(पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, सोलापूर महानगरपालिका.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई-४०००२०
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१६. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई
१७. वित्त विभाग (व्यय-१६)
१८. नियोजन विभाग (कार्यासन-१४७२)
१९. पर्यावरण व वातावरणीय बदल विभागातील सर्व कार्यासने
२०. निवड नस्ती.